**ठाणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर क्रीडा अधिकारी, वर्ग-१ चे पद निर्माण करण्यास मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- ठामपा-२१२०/प्र.क्र.७०/नवि-२३,**

मंत्रालय (मुख्य इमारत), ४ था मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-३२.
दिनांक:- ०९ नोव्हेंबर, २०२०

वाचा:- (१) आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांचे पत्र क्रमांक ठामपा/आयुक्त/उपआ (मु)१२१८, दिनांक ०१.१०.२०१६

(२) शासन निर्णय क्र. ठामपा-२११६/प्र.क्र.३१ (अ)/नवि-२३, दिनांक १९.०९.२०१९

(३) आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांचे पत्र क्रमांक ठामपा/आस्था/अतिआ (२) /आयुक्त-५७२५, दिनांक १४.०२.२०२०

**प्रस्तावना:-**

ठाणे महानगरपालिका क्षेत्रातील वाढती लोकसंख्या विचारात घेता, सदर लोकसंख्येस खेळाचे मैदाने तसेच क्रीडा विषयक विविध उपक्रम राबविणे व यशस्वीपणे पार पाडण्यासाठी, शहरात नव्याने निर्माण झालेली क्रिडांगणे व क्रीडा विषयक उपक्रमाचे उच्च दर्जाचे नियोजन करण्यासाठी ठाणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सध्या अस्तित्वात असलेले क्रीडा अधिकारी वर्ग-२ चे मंजूर पद वेतनबँड रु. १५६०० - ३९१०० अधिक ग्रेड पे ५४०० मध्ये उन्नत करुन सदर पदास प्रशासकिय सेवा वर्ग- १ या दर्जाचे करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास संदर्भाधीन क्र.३ अन्वये ठाणे महानगरपालिका यांनी सादर केला होता.

०२. ठाणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर संदर्भाधीन क्र. २ अन्वये महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ५१ (४) नुसार एकूण ६८२ नवीन पदे निर्माण करण्यास शासनाने मान्यता प्रदान केली आहे. तथापि, उपरोक्त परिच्छेद क्रमांक १ मध्ये नमूद केल्यानुसार आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

ठाणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर क्रीडा अधिकारी वर्ग - १, वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१००, ग्रेड पे- ५४०० चे एक पद नव्याने निर्माण करण्यास महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५१ (४) नुसार शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** सदर पदाची भरती पध्दती, शैक्षणिक अर्हता खालील प्रमाणे राहील.

- **भरती पध्दती**- नामनिर्देशन/पदोन्नती द्वारे
- **अर्हता:**-१) शारीरिक शिक्षणातील पदव्युत्तर पदवी किमान द्वितीय श्रेणी उत्तीर्ण असणे आवश्यक (M.P.Ed)

  २) एन.एस.एन.आय चा १ वर्षाचा मैदानी किंवा कोणत्याही खेळातील पदविका

  ३) एन.सी.सी. मधील “सी” परिक्षा प्रमाणपत्र धारकास प्राधान्य
- **अनुभव:**- क्रीडा मार्गदर्शन व क्रीडा आयोजनाचा किमान ३ वर्षाचा अनुभव असावा.
- **खेळातील सहभाग:**-१) विद्यापीठीय संघातून खेळलेला असावा.

  २) राष्ट्रीय पातळीवरील संघात खेळलेल्या व शासनाकडील पुरस्कार विजेत्या उमेदवारास प्राधान्य वयाची अट शिथिलक्षम.

  ३) महापालिका कर्मचाऱ्यांकरिता शासन निर्णयानुसार वयाची अट शिथिलक्षम.

  ४) शासनाकडील पुरस्कार प्राप्त खेळाडू यांचेकरिता वरील अट क्र. १ ते ३ अटी शिथिलक्षम.

**०३.** आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांनी परिच्छेद क्र.१ व २ मधील अटी व शर्तींचे पालन करून पुढील आवश्यक ती कार्यवाही करावी.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२०११०९१४४५०४३६२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shankar Trambak Jadhav

Digitally signed by Shankar Trambak Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=65f3f4695111ee4b72455e21ef9099788d9b999ffbcaaa070711f14d2a10e138, serialNumber=c83ebbb277c2e72c85231b87f684c424a13c398a4f921b6d167a8c859e9817f5, cn=Shankar Trambak Jadhav
Date: 2020.11.09 14:49:04 +05'30'

**( शंकर जाधव )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) महापौर, ठाणे महानगरपालिका, जि.ठाणे.
३) आयुक्त, ठाणे महानगरपालिका, जि.ठाणे.
४) मा.मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, यांना माहितीस्तव अग्रेषित.
६) निवड नस्ती, नवि-२३.